पूर्वतयारी व क्षमताबांधणी अंतर्गत जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांना वितरीत करण्यात येणाऱ्या निधीच्या खर्चाबाबत मानक कार्यपद्धती.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग, मदत व पुनर्वसन**
**शासन निर्णय क्रमांक :-आव्यप्र-२०२४/प्र.क्र.९३/आव्यप्र-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक - ११ जुलै, २०२४.

**प्रस्तावना:-**

आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ च्या तरतूदीनुसार मा. मुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली महाराष्ट्र राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाची स्थापना करण्यात आली आहे. -आपत्तीप्रसंगी प्रतिसाद देणाऱ्या यंत्रणांचे सक्षमीकरण करणे॰ ही प्राधिकरणाची मुख्य जबाबदारी आहे. तसेच या अधिनियमाच्या कलम २२ व २४ मध्ये राज्य कार्यकारी समितीच्या जबाबदाऱ्या नमूद केल्या आहेत. यामध्ये आपत्तीला सक्षमपणे तोंड देण्याकरिता करावयाच्या उपाय योजना व कार्ये नमूद करण्यात आली आहेत. त्याचप्रमाणे दि. १९ नोव्हेंबर, २०२० रोजीच्या केंद्रीय गृह मंत्रालयाच्या पत्रान्वये आपत्तीला योग्य प्रतिसाद देण्यासाठी राज्य आपत्ती धोके व्यवस्थापन निधी (SDRMF) या नावाने राज्य आपत्ती प्रतिसाद निधीपैकी क्षमता बांधणी तसेच सौम्यिकरणासाठी स्वतंत्र निधी राखीव ठेवण्याबाबत निर्देश देण्यात आले आहेत.

उपरोक्त संदर्भानुसार आपत्ती व्यवस्थापना अंतर्गत विविध उपाययोजना करण्याकरिता जिल्ह्यांना वितरित करण्यात आलेल्या निधीच्या खर्चाबाबत नियोजन व खर्च मर्यादा याबाबत मानक कार्यपद्धती निश्चित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

राज्य शासनामार्फत सर्व जिल्ह्यांना आपत्ती व्यवस्थापन विषयक कामांकरिता, पुर्वतयारी व क्षमताबांधणी (वित्त आयोग) (२२४५-४१८८) या लेखाशिर्षाखाली निधी वितरीत करण्यात येतो. या अंतर्गत जिल्ह्यांना आपत्ती व्यवस्थापन अधिनियम, २००५ च्या कलम ३१ प्रमाणे जिल्हा आपत्ती व्यवस्थापन आराखडा तयार करुन त्यानुषंगाने आपत्तीमुळे निर्माण होणारे धोके व नुकसान कमी करण्याकरिता, प्रतिबंधात्मक उपाययोजना करणे, सौम्यीकरण उपाययोजना राबविणे, पूर्वतयारी व क्षमता बांधणी विषयक उपक्रम राबवणे, प्रशिक्षण व जनजागृती करणे, शोध व बचाव कार्य, आपत्ती व्यवस्थापना संबंधित साहित्य खरेदी/ दुरुस्ती या करिता निधी उपलब्ध करून देण्यात येतो.

२. आपत्ती व्यवस्थापनाशी संबंधित पुढीलबाबींकरिता सदर निधीचा विनियोग करण्यास शासन मान्यता देत आहे. सदर बाबींवरील खर्चमर्यादा स्तंभ क्र. -३॰ मध्ये दर्शविल्याप्रमाणे राहील.

| अ.क्र | जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणास लेखाशीर्ष २२४५-४१८८ अंतर्गत प्राप्त निधीतून पुढील बाबींवर खर्च करता येईल. | | खर्च मर्यादा |
|---|---|---|---|
| १ | २ | | ३ |
| १ | अ - प्रशिक्षण व क्षमता बांधणी | | ३५% |
| | १ | प्रशिक्षण | |
| | २ | कार्यशाळा | |
| | ३ | रंगीत तालीम | |
| | ४ | जनजागृती कार्यक्रम | |
| | ५ | आपत्ती व्यवस्थापना संबंधी जनजागृती साहित्य / माहितीपर साहित्य / शैक्षणिक साहित्य (IEC) यांची छपाई व प्रसारण | |

| | | | |
|---|---|---|---|
| २ | | **ब- खरेदी व दुरुस्ती** | ५०% |
| | १ | आपत्ती व्यवस्थापनासंबंधी साहित्य व उपकरणे यांची खरेदी किंवा भाडे | |
| | २ | आपत्ती व्यवस्थापनासंबंधी साहित्य व संसाधने यांची देखभाल व दुरुस्ती | |
| | ३ | आपत्ती दरम्यान अत्यावश्यक बाबींची खरेदी ( अन्न पाकिटे/ पाणी/ औषधे/ बॅकेट्स/ कपडे/ इत्यादी ) | |
| | ४ | जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांच्या ताब्यातील बोट/ जनरेटर व इतर साहित्य यांच्या आपत्कालीन / नियमित वापराकरिता तसेच देखभाली करिता इंधन खर्च (पेट्रोल/ डिसेल/ गॅस /केरोसीन/जनरेटर/ बॅटरी इत्यादी) | |
| ३ | | **क – कार्यालयीन खर्च** | ५% |
| | १ | कार्यालयीन स्टेशनरी | |
| | २ | DEOC वीज देयक | |
| | ३ | DEOC दूरध्वनी देयक | |
| | ४ | DEOC इंटरनेट देयक | |
| | ५ | DEOC मोबाईल देयक | |
| | ६ | DEOC TV करिता केबल/ डिश सेवा देयक | |
| | ७ | DEOC सेटलाइट देयक | |
| | ८ | फर्निचर खरेदी व दुरुस्ती | |
| ४ | | **ड – वाहतूक / प्रवास / खानपान / दैनंदिन भत्ता इ. बाबींवरील खर्च** | १०% |
| | १ | आपत्कालीन परिस्थितीत जिल्हा प्रशासनास प्रासंगिक/ तात्पुरत्या स्वरुपात आवश्यक मनुष्यबळाचे (आपदा मित्र / स्थानिक शोध व बचाव पथक/ स्वयंसेवक/ NGO/ इत्यादी ) दैनंदिन मानधन, खानपान, निवास व वाहतूक व्यवस्था. | |
| | २ | शोध व बचाव कार्य/ प्रशिक्षण व जनजागृती कार्यक्रम/ कार्यशाळा / रंगीत तालीम / आपत्ती व्यवस्थापनाशी संबंधित दौरा, बैठक या करिता आलेल्या NDRF/ SDRF/ DDRF / स्थानिक शोध व बचाव पथक तसेच राष्ट्रीय/ राज्य/ जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण (NDMA/ SDMA/DDMA) यांचे अधिकारी, कर्मचारी, सल्लागार तसेच इतर निमंत्रित व्यक्ती यांची निवास/ खानपान/ वाहतूक व्यवस्था. | |
| | ३ | जिल्हा आपत्ती व्यवस्थापन अधिकारी, सल्लागार व आय.टी सहाय्यक यांच्या जिल्हा अंतर्गत व जिल्ह्याबाहेरील बैठक/ प्रशिक्षण /कार्यशाळा इत्यादी करिता प्रवास / निवास खर्च व दैनंदिन भत्ता. | |
| | ४ | आपत्कालीन प्रसंगी वाहतूक सेवा शुल्क / वाहनांकरीता इंधन / हमाली. | |
| **एकूण** | | | **१००%** |

३. उपरोक्त प्रमाणे जिल्ह्याला उपलब्ध करून देण्यात येणाऱ्या निधीच्या खर्चाबाबत वार्षिक आराखडा तयार करून त्यास जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाची मान्यता घेण्यात यावी व त्याची प्रत राज्य आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण, मंत्रालय, मुंबई यांस सादर करावी. सदर खर्च शासनाने उपरोक्त प्रमाणे ठरवून दिलेल्या खर्च मर्यादेत व नमूद घटकांवरच करण्यात यावा.

४. आपत्कालीन परिस्थितीत अथवा आकस्मिक बाबीवर शासनामार्फत उपरोक्त प्रमाणे ठरवून दिलेल्या खर्च मर्यादेपेक्षा जास्त खर्च करणे आवश्यक असल्यास त्यासाठी जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरणाची पूर्वमंजुरी अथवा कार्योत्तर मंजूरी घेणे आवश्यक राहील.

५. वित्तीय वर्ष पूर्ण झाल्यानंतर ३० दिवसाच्या आत जिल्हाधिकारी तथा अध्यक्ष, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांच्या सही व शिक्क्यासह उपरोक्त तक्यानुसार ज्या बाबींवर खर्च करण्यात आला आहे, त्याची तपशीलवार माहिती, अंतर्गत लेखापरीक्षण अहवाल तसेच निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करणे, जिल्हा आपत्ती व्यवस्थापन प्राधिकरण यांना बंधनकारक राहील.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharshtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२४०७१११६५२४३३०१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

HITENDRA YADAORAO DUFARE

Digitally signed by HITENDRA YADAORAO DUFARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=1170c73752038d1c4f8b3a8c1729f3f55bd8bd13206eed4aead71a63b3f1dcee, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=02BBA6FFE202C222698F7E91A562A124096291549EBA836EE89EC11CB9F688D5, cn=HITENDRA YADAORAO DUFARE
Date: 2024.07.11 17:04:11 +05'30'

(हितेंद्र दुफारे)
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत -**

१. महालेखापाल,(महाराष्ट्र-) मुंबई/नागपूर.
२. सर्व विभागीय आयुक्त
३. सर्व जिल्हाधिकारी.
४. वित्तीय सल्लागार व सह सचिव, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई/नागपूर.
६. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
७. लेखाधिकारी, आपत्ती व्यवस्थापन प्रभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवड नस्ती/ आव्यप्र-१.